सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या सर्व शासकिय रुग्णांलयांतर्गत नॅकोफ इंडिया लिमिटेड (NACOF) या संस्थेस जेनेरीक औषधी दुकान सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः जनऔ-२०२३/प्र.क्र.१०७/आरोग्य-३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३१ जुलै, २०२३.

वाचा :

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.जिरुआ २००३/१६८/आरोग्य-३, दि.१९ मार्च, २००८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.संकिर्ण-२०१३/प्र.क्र.२११/आरोग्य-३, दि.०७ मे, २०१३.
३) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१३७/नवि-२०, दि.०२ फेब्रुवारी,२०२३.
४) नॅकोफ इंडिया लिमिटेड, नवी दिल्ली यांचे दि.१३.०१.२०२३ चे पत्र.
५) आयुक्त, आरोग्य सेवा , आयुक्तालय यांचे दि.२८.०६.२०२३ रोजीचा प्रस्ताव.
६) मा.मंत्रिमंडळ निर्णय दि. २१ जुलै, २०२३.

प्रस्तावना :

भारत सरकारच्या प्रधानमंत्री भारतीय जन औषधी केंद्र या योजनेतंर्गत गोर-गरीबांना स्वस्तात औषधे उपलब्ध व्हावे म्हणून जेनेरीक जनऔषधालय योजना सुरु करण्यात आली आहे. त्यामुळे औषधांवर होणाऱ्या खर्चात किमान १० टक्क्यांपासून कमाल ७० टक्कांपर्यंत बचत होत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे राज्यातील सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या आरोग्य रुग्णालयांच्या परिसरात नगर विकास विभागाच्या धर्तीवर जेनेरीक औषधी दुकाने सुरु करण्यास परवानगी मिळण्याबाबत नॅकोफ इंडिया लिमिटेड

(NACOF), नवी दिल्ली या संस्थेने विनंती केली आहे. संस्थेने त्यांच्या पत्रात खालीलप्रमाणे वस्तुस्थिती नमूद केलेली आहे.

१.१) नॅशनल फेडरेशन ऑफ फारमर्स प्रोक्युरमेंट प्रोसेसिंग अँड रिटेलिंग को-ऑपरेटिव्ह ऑफ इंडिया (NACOF India Ltd.) ही बहूराज्यीय सहकारी संस्था असून, बहूराज्यीय सहकारी संस्था अधिनियम, २००२ अंतर्गत सन २००९ मध्ये नोंदणीकृत आहे. ही संस्था महाराष्ट्रासह २१ राज्यात एकूण ७२ शाखांमार्फत वेगवेगळ्या क्षेत्रामध्ये काम करीत आहे. संस्थेचे मुख्यालय नवी दिल्ली येथे असून सन २०२१-२०२२ मध्ये संस्थेची उलाढाल रु.३६७२ कोटींची असल्याचे संस्थेने नमूद केले आहे.

१.२) सदर संस्थेस छत्तीसगड, आसाम, कोलकत्ता, उत्तर-प्रदेश या राज्य सरकारांनी गहू, तांदूळ खरेदी, चनाडाळ, साखर पूरवठा तसेच बियाणे पूरवठा व खतांचे विपणन यासाठी नामनिर्देशित केले आहे. तसेच एसएसपी ऑपरेशन अतंर्गत जूट खरेदीसाठी जूट कॉर्पोरेशन ऑफ इंडिया, कोलकत्ता यांच्याशीही संस्थेने करार केलेला आहे. तसेच संस्था स्वत: किंवा संस्थेचे नोंदणीकृत पुरवठादार यांच्याशी संयुक्त उपक्रम करुन बियाणांची निर्मिती व त्यांचे विपणन करण्यातही पुढे आहे. तसेच बिगर शेती वस्तू व खत पुरवठा इत्यादी सारख्या क्षेत्रातही संस्थेने विविध क्षेत्रात आपली नोंद केली आहे.

१.३) संस्थेने वरील क्षेत्रातील सहभाग व कामकाजाबरोबरच आता मा.प्रधानमंत्री जनऔषधी योजनेंतर्गत अनेक राज्यांमध्ये शासकीय रुग्णालयांत नोंदणीकृत पुरवठादाराच्या माध्यमातून जनऔषधी केंद्र स्थापन केले आहेत. सद्य:स्थितीत भारत सरकारच्या अधिपत्याखाली (१) डॉ.राममनोहर लोहिया, रुग्णालय, नवी दिल्ली (२) सफदरगंज रुग्णालय आणि व्ही.एम.मेडीकल कॉलेज, नवी दिल्ली (३) लेडी हार्डिंग मेडिकल कॉलेज आणि श्रीमती एस.के.रुग्णालय, नवी दिल्ली या रुग्णालयांमध्ये प्रधानमंत्री जनऔषधी योजनेतंर्गत जनऔषधालयांची उभारणी करुन चालविण्यासाठी नॅकोफ संस्थेस परवानगी देण्यात आली आहे.

१.४) सदर संस्था एच.एल.एल. लाइफ केअर लिमिटेड या शासनमान्य संस्थेचे "अमृत स्टोअर्स" या नावाने औषधी दुकाने उघडणे आणि चालविण्याच्या व्यवसायात सहभागी होत आहे. या स्टोअर्समधून शासकीय रुग्णालयातील रुग्णांना परवडणारी औषधे व विश्वासार्ह वैद्यकीय उपकरणे यांचा माफक दराने पुरवठा केला जाणार आहे. शासनाच्या आरोग्य विभागाचे

अखत्यारितील रुग्णालयांमध्ये जेनेरीक औषधी दुकाने सुरू करण्याकरीता संस्थेकडे आवश्यक अनुभव आणि यंत्रणा उपलब्ध असल्याचे नमूद केले आहे.

१.५) भारत सरकारच्या जनऔषधी धोरणानुसार गोरगरीब रुग्णांना माफक दरात जेनेरीक औषधे उपलब्ध करुन देणे हा मुख्य उद्देश आहे. जेणेकरुन औषधी अभावी रुग्णांची अडवणूक होऊ नये. नॅकोफ (NACOF India Ltd.), नवी दिल्ली या संस्थेचे विविध क्षेत्रातील कामकाज पाहून भारत सरकारने संस्थेस नवी दिल्ली येथील भारत सरकारच्या अधिपत्याखालील वर उल्लेखित रुग्णालयांमध्ये जनऔषधींचा पुरवठा करण्यासाठी थेट परवानगी देऊन त्यासाठी काही अटी-शर्तींवर रुग्णालयांच्या परिसरात आवश्यक जागा आणि अनुंषगिक सुविधा उपलब्ध करुन दिल्या आहेत. त्याच धर्तीवर राज्यातील आरोग्य रुग्णालयांमध्ये सदर जनऔषधी योजनेंतर्गत सदर संस्थेस जेनेरीक जनऔषधालय सुरु करण्यास व त्यासाठी आवश्यक जागा उपलब्ध करुन देण्यास सहमती देण्याचा प्रस्ताव संस्थेने शासनास सादर केला आहे.

०२. नगर विकास विभागाच्या दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये नगर विकास विभागांतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांव्दारे चालविण्यात येणाऱ्या रुग्णांलयाच्या परिसरात, जेनेरीक औषधी दुकान सुरु करण्यास काही अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयाच्या धर्तीवर, सदर शासन निर्णयातील अटी शर्तींमध्ये आवश्यक ते बदल करुन, सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या रुग्णालयांच्या परिसरात नॅकोफ इंडिया लिमिटेड (NACOF India Ltd.) या संस्थेस जेनेरिक औषधे विक्री करण्यासाठी व जेनेरिक औषधी दुकान सुरु करण्यास परवानगी देण्यास तसेच रुग्णालयातील उपलब्ध परिसरातील जागा आवश्यक त्या सोयी-सुविधा सदर संस्थेस उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्तावित आहे.

०३. मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठात शासकीय रुग्णालयांसंदर्भात दाखल जनहित याचिका क्र.३४२७/२००० प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने “रुग्णांना पुरविण्यात न येणाऱ्या औषधी व उपकरणांची खरेदी रुग्णांना करता यावी यासाठी रुग्णालयाच्या परिसरात औषधी दुकानांच्या निर्मितीची” शिफारस केल्यानुसार, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने त्यांच्या अधिपत्याखालील रुग्णालयांमध्ये महाराष्ट्र स्टेट को-ऑप कन्झुमर्स फेडरेशन लि., मुंबई या संस्थेस वापरण्यास परवानगी दिली आहे. त्यामुळे नगरविकास विभागाच्या धर्तीवर सार्वजनिक आरोग्य

विभागाच्या आरोग्य रुग्णालयांमध्ये जेनेरिक औषधाची दुकाने स्थापन करण्याकरीता मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या रुग्णालयांच्या परिसरात सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या सर्व शासकिय रुग्णांलयांमध्ये (उपकेंद्रे वगळून) नॅकोफ इंडिया लिमिटेड या संस्थेस जेनेरीक औषधाची दुकाने स्थापन करण्याकरीता परवानगी देण्यात येत आहे.

२ . सार्वजनिक आरोग्य विभागाच्या आरोग्य संस्थांमध्ये जेनेरिक औषधांच्या दुकानाकरीता जागा उपलब्ध करण्याकरीता विभागाच्या शासन निर्णय दि. १९ मार्च,२००८ रोजी धोरणात अंशत: बदल करुन फक्त शासकिय आरोग्य रुग्णांलयामध्ये जेनेरिक औषधाच्या दुकानांकरीता नॅकोफ इंडिया लिमिटेड, नवी दिल्ली या संस्थेस जागा उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापि, सदर मान्यता दिल्यामुळे शासनाच्या दि.०७ मे,२०१३ रोजीचे मोफत औषधे व उपचार देण्याबाबतच्या धोरणात कोणताही बदल होणार नाही.

**३.** जेनेरिक औषधांची दुकाने स्थापन करण्याकरीता खालीलप्रमाणे अटी व शर्तीचे पालन करणे बंधनकारक राहील.

**अ) प्रशासकीय अटी-शर्ती :-**

१) नॅकोफ इंडिया लिमिटेड (NACOF India Ltd.), नवी दिल्ली या संस्थेस जेनेरीक औषधी दुकानासाठी आवश्यक असणारी उपलब्ध बांधकामांतील किंवा परिसरातील प्रथम दर्शनी भागात सुमारे २०० ते २५० चौ.फूट इतकी जागा प्रथमत: २० वर्षाकरीता भाडे तत्वावर उपलब्ध करण्यात येईल. तद्नंतर, सदर संस्थेच्या सेवा समाधानकारक असल्यास पुढील १० वर्ष सदर संस्थेस भाडेतत्वावर देण्याबाबत पुढील निर्णय शासनातर्फे घेण्यात येईल.

२) याबाबत संबंधित संस्थेबरोबर अटी व शर्ती नुसार योग्य तो करारनामा व जागा निश्चिती करण्याबाबतची कार्यवाही करण्याचे अधिकार आयुक्त, आरोग्य सेवा यांना राहील.

३) सदर जागा भाडेतत्वावर देण्यात येत असल्याने संबंधित जागेचे भाडे सार्वजनिक बांधकांम खात्याकडून निश्चित करावे. त्यामध्ये दर तीन वर्षांनी नियमानुमार वाढ करणे आवश्यक राहील.

सदरहू भाडे तीन महिने थकित राहिल्यास ते नियमानुसार व्याजासह वसूल करण्यात येईल अथवा जागा खाली करुन घेण्यात येईल.

४) जागेच्या भाडयापोटी जमा होणारी रक्कम संबंधित रुग्णालयाच्या रुग्ण कल्याण समितीमध्ये जमा करण्यात यावी.

५) पाणी/वीज वापरासाठी स्वंतत्र मीटर बसविणे नॅकोफ इंडिया लिमिटेड या संस्थेस बंधनकारक असेल. त्याअनुषंगाने येणारी देयके अदा करणे त्या संस्थेवर बंधनकारक राहील. तसेच सदर जेनेरीक औषधाच्या दुकानातील सामान व साहित्यसामुग्रीच्या सुरक्षेची जबाबदारी संस्थेचीच राहील.

६) जन औषधी उपलब्ध नसल्यास इतर ब्रँडेड अथवा जेनरिक औषधी सदर संस्थेने उपलब्ध करून द्यावी लागतील अशा वेळी ब्रॅडेड औषधीच्या दर्शनी मुल्यावर ५ % इतकी सवलत रूग्णाना देणे बंधनकारक राहील.

७) औषधी दुकानास जागा अन्न व औषध प्रशासनाच्या प्रचलित नियमाप्रमाणे उपलब्ध करून देण्यात यावी.

८) शासनाच्या आरोग्य संस्थामधील औषधे व NACOF च्या दुकानातील औषधांमध्ये अदलाबदल तसेच परस्पर औषधांचा साठा संपला म्हणून काळाबाजार होणार नाही याची दक्षता घ्यावी, असे आढळुन आल्यास NACOF या संस्थेस काळया यादीत टाकण्याची कार्यवाही करण्यात येईल.

**ब) तांत्रिक अटी-शर्ती** :-

१) संबंधित जिल्ह्याचा जिल्हा शल्यचिकित्सकाने रुग्णांलय स्तरावर आवश्यक त्या अधिकारी / कर्मचारी व अन्न व औषध प्रशासनाचा प्रतिनिधी यांची एक समिती स्थापन करण्यात येईल. ही समिती संबंधित संस्थेच्या वतीने चालविण्यात येणाऱ्या औषधी दुकानाच्या कामकाजाचा दर एका वर्षांनी आढावा घेण्यात येईल. आणि त्याबाबतचा अहवाल आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांना पाठविल.

२) अन्न व औषध प्रशासन विभागाच्या नियमाप्रमाणे ज्या ठिकाणी औषध व्यवसाय करणे प्रस्तावित आहे. त्याच जागेसाठी विक्री परवाना घेणे बंधनकारक राहील.

३) सदरहू औषधी दुकाने २४ तास सुरु ठेवणे अभिप्रेत असल्याने औषध दुकानातील खरेदी व विक्रीसाठी किमान तीन रजिस्टर्ड औषध निर्मात्यांची नेमणूक करणे कायद्याने बंधनकारक राहील. ही नेमणूक करताना शासन धोरणानुसार अपंग व्यक्ती, महिला यांना प्राधान्य देण्यात यावे.

४) संस्थेने नेमलेल्या औषध निर्मात्याने राज्याच्या फार्मसी कौन्सीलकडे नोंदणीकृत असणे व वेळोवेळी नोंदणी अद्ययावत करणे बंधनकारक राहील.

५) अन्न व औषध प्रशासन विभागाच्या नियमाप्रमाणे औषधे व इतर वस्तू ठराविक तापमानात साठविण्यासाठी पुरेशी शीतकपाटे असणे तसेच इतर बाबींची पूर्तता शेड्यूल-पी प्रमाणे करणे बंधनकारक राहील.

६) अन्न व औषध प्रशासन विभागाच्या नियमाप्रमाणे नार्कोटिक्स व सायकियाट्रिक्स सबस्टन्सेस यांचा साठा वेगळा सिलबंद व त्यांचे दस्तऐवज यांचे काटेकोरपणे पालन होणे आवश्यक राहील.

७) अन्न व औषध प्रशासन विभागाच्या नियमाप्रमाणे पुरेशी जागा व औषधे साठविण्यासाठी वातानुकूलित व्यवस्था असणे आवश्यक आहे.

८) जी औषधे शासनाच्या दरकरारावर आहेत परंतु दरकरारावर पुरवठा न झालेल्या औषधांसह बाहेरुन खरेदी करणे गरजेचे आहे, अशी औषधे सुध्दा सदर दुकानातून उपलब्ध करुन देण्यात येतील.

९) औषधांची विक्री करताना नॅशनल फार्मास्युटीकल प्रायसिंग ॲथॉरिटी च्या नियमाप्रमाणे किंमतीचे पालन करणे बंधनकारक राहील.

१०) सदर औषधांच्या दुकानामध्ये बाहेरुन येणाऱ्या प्रत्येक औषधांची नोंद नोंदवहीत ठेवणे आवश्यक आहे. तांत्रिक समितीकडून अशा नोंदवहीतील नोंदी व प्रत्यक्ष साठा यांची पडताळणी अधुनमधून करण्यात येईल.

११) नियुक्त केलेल्या तांत्रिक समितीकडून वरील सर्व तांत्रिक बाबींचे व नियमांचे काटेकोरपणे पालन होत असल्याबाबत सहामाही तपासणी करण्यात येईल व त्याचा अहवाल आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांना सादर करावा.

१२) औषध खरेदी, विक्री, साठवणूक, आवश्यक आर्थिक गुंतवणूक व त्या अनुषंगाने दुकान चालविण्यासाठी आवश्यक यंत्रणा उभी करण्याची जबाबदारी व त्यांच्या नियमातील तरतूदीनुसार या नॅकोफ इंडिया लिमिटेड या संस्थेची राहील.

**०४.** सदर शासन निर्णय मा.राज्य मंत्रिमंडळाची दि.२१ जुलै, २०२३ रोजी झालेल्या बैठकीतील विषय क्रं. ११ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२११३१६०९८९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.07.31 14:15:35 +05'30'

( अशोक आत्राम )

सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव महोदयांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई.
१०. सर्व आयुक्त, महानगरपालिका
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

१२. उपसंचालक, आरोग्य सेवा, सर्व मंडळ विभाग
१३. सर्व जिल्हा शल्यचिकित्सक
१४. सर्व संबंधित आरोग्य संस्थाचे वैद्यकिय अधिक्षक
१५. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
१६. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
१७. नॅशनल फेडरेशन ऑफ फारमर्स प्रोक्युरमेंट प्रोसेसिंग अँड रिटेलिंग को-ऑपरेटिव्ह ऑफ इंडिया लिमिटेड, ऑफिस नं.५११,५ वा मजला, सिंगनेचर बिसनेस पार्क, पोस्टल कॉलनी, चेंबूर पूर्व, मुंबई - ४०० ०७१.
१८. निवड नस्ती (आरोग्य-३)